भक्तियुक्त व्रतानें सत्यविनायक संतुष्ट झाला आणि त्याला ह्मणाला, हे सुदाम ब्राह्मणा,
मनास वाटेल तो वर माग. मी सर्व तुला देईन. मी तुझ्या भक्तीनें आणि स्तोत्रानें संतुष्ट
झालों ॥ ५७ ॥ हें सत्यविनायकाचें भाषण ऐकून सुदामा ह्मणतो, देवा, तुझ्या स्वरूपाला
ब्रह्मदेव, विष्णु, शंकर इत्यादिक देवही जाणत नाहींत ॥ ५८ ॥ तें स्वरूप जर आज मला

व्रतेनपरितुष्टोहंभक्त्यास्तोत्राद्ददामितान् ॥ ॥ सुदामोवाच ॥ ॥
नविदुर्यत्स्वरूपंतेब्रह्माहरिहरादयः ॥ ५८ ॥ कमन्यंहिवरंयाचेकृपयाद्द
क्पथंगतः ॥ देहिभक्तिंत्वच्चरणेदृढामव्यभिचारिणीम् ॥ ५९ ॥ श्रीशिव
उवाच ॥ ॥ दत्त्वाभक्तिंदृढांतस्मैसंपदंधनदाधिकाम् ॥ ययौस्वानंदभु
वनंदेवःसत्यविनायकः ॥ ६० ॥ इतिश्रीब्रह्मांडपुराणेशिवपार्वतीसंवादे
सत्यविनायकव्रतोपाख्यानेप्रथमोऽध्यायः ॥ १ ॥ ॥ ॥

दृष्टिगोचर झालें तर याहून अन्य वर कोणता मागावा? हे भगवन्, तुझ्या चरणकमलीं ॥२३॥
अव्यभिचारिणी दृढ अशी भक्ति दे ह्मणजे झालें ॥ ५९ ॥ शिव ह्मणतात; हें सुदामाचें भाषण
ऐकून सत्यविनायक देव आपले ठिकाणीं दृढभक्ति आणि कुबेराहून अधिक संपत्ति सुदामाला

देऊन आपल्या आनंदभुवनाला जाता झाला ( अंतर्धान पावला ) ॥ ६० ॥ इति श्रीब्रह्मांडपुराणे सत्यविनायककथामहाराष्ट्रटीकायां प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥ पार्वती ह्मणाली, हे प्राणेश, तो भगवान् सत्यविनायक अंतर्धान पावल्यानंतर त्या सुदामाला संपत्ति कशी मिळाली! ॥ १ ॥ कारण, तो केवळ अयाचितवृत्तीनें चरितार्थ करणारा होता, व्यवहार धंदा कांहीं नाहीं,

॥ पार्वत्युवाच ॥ ॥ अंतर्हितेभगवतिदेवेसत्यविनायके ॥ सुदामासक
थंलेभेपरांप्राणेशसंपदम् ॥१॥ कुर्वन्नमृतवृत्त्यातुव्रतंयोगपरायणः ॥ ॥
॥ श्रीशिवउवाच ॥ ॥ प्रसासार्थंजागरायसमाहूताःसमागताः ॥ २ ॥
ग्रामीणाःपुरुषानार्यस्तेषुवैश्यःसचाययौ ॥ दृष्ट्वातच्चित्रमखिलंविनयात्पृ
ष्टवानसौ ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥

मग संपत्ति कशी मिळाली तें सांगा. हा प्रश्न ऐकून शिव ह्मणाले, हे प्रिये ऐक. मणिनांवाच्या वैश्याकडून पांचशें मोहरा मिळून सुदामानें व्रत केलें त्याच्या प्रसादार्थ व जागरार्थ ॥ २ ॥ गांवांतील स्त्रिया व पुरुष आले होते, त्यांमध्यें तो वैश्यही आला होता. त्यानें तो चमत्कार पाहून मोठ्या नम्रतेनें सुदामाला विचारिलें ॥ ३ ॥

मणि ह्मणतो, हे ब्राह्मणा, तूं अत्यंत दरिद्री असून यावेळीं सुदैवानें तुला पुष्कळ द्रव्य मिळालें तें तूं सर्व या व्रताकडे खर्च केलेंस याचें कारण काय तें कृपाकरून मला सांग ॥ ४ ॥ माझें सर्व धन गेल्यामुळें मी अत्यंत शोकानें व्याकुळ झालों आहें. याचें माहात्म्य समजेल तर मीही हें

॥ मणिरुवाच ॥ ॥ भवानकिंचनोऽतीवलब्ध्वापिविपुलंधनम् ॥
अस्मिन्व्ययीकरोत्सर्वंकिमेतत्कृपयावद ॥४॥ अहंतदाचरिष्यामिविधनः
शोकसंकुलः ॥ श्रुत्वासविनयांवाणींततोसौसदयोद्विजः ॥५॥ उक्त्वा
सर्वंस्ववृत्तांतंव्रतंतस्माउपादिशत् ॥ विलोक्यचित्रंतत्सर्वंजनाःसद्भावभा
विताः ॥ ६ ॥ ददुर्नानाभूषणानिवसनानिधनानिच ॥ पुनर्द्विगुणद्रव्ये
णसुदामास्वगृहंययौ ॥ ७ ॥ ॥ ॥

व्रत करीन, अशी त्याची सविनय वाणी ऐकून सुदामाला दया आली ॥५॥ आणि आपला सर्व वृत्तांत त्याला सांगून सत्यविनायकव्रताचा उपदेश केला, सुदामानें सर्व द्रव्य व्रताला खर्च केलें हें आश्चर्य पाहून तेथें जमलेले सर्व लोक सद्भावानें युक्त झाले ॥६॥ नंतर त्यांनीं सुदामाला बहुत

द्रव्य, वस्त्रें, अलंकार इत्यादि दिले. त्या योगानें त्याच्याजवळ पुनः दुप्पट द्रव्य झालें. व तें घेऊन तो आपले घरीं गेला ॥ ७ ॥ घरीं जातो तों चमत्कार असा झाला कीं, त्याची पर्णकुटी होती ती कोठें दिसेना त्यामुळें तो चिंताक्रांत होऊन इकडे तिकडे पाहत आहे तें स्त्रियेनें पाहिलें आणि तिनें सेवकांला पुढें पाठविलें. ॥ ८ ॥ तेव्हां त्यांनीं सुदामाजवळ जाऊन

नापश्यत्तांपर्णकुटींचिंतांपरमिकामगात् ॥ तावत्तुसेवकास्तस्यकांतयापरि
नोदिताः ॥ ८ ॥ अभिगम्यार्चयामासुस्तैलाभ्यंजनपूर्वकम् ॥ स्नापयि
त्वात्वलंचक्रुरंशुकैर्भूषणैःशुभैः ॥ ९ ॥ अत्याश्चर्ययुतौचोभौपश्यतःसर्व
संपदः ॥ रत्नकांचनभित्तीश्चपर्यंकान्वस्त्रसंचयान् ॥ १० ॥

मोठ्या सत्कारानें त्याला घरांत आणला आणि तैलाभ्यंग करून उष्णोदकानें स्नान घातलें व उंची वस्त्रें, भूषणें यांनीं त्याला अलंकृत केला ॥ ९ ॥ त्यावेळीं सुदामा व त्याची स्त्री हीं उभयतां चकित होऊन चहूंकडे पाहूं लागलीं तों घराच्या भिंती रत्नजडित झाल्या आहेत, ठिकठिकाणीं मजेदार पलंग शोभत आहेत, व जिकडे तिकडे उत्तम उत्तम वस्त्रें झळकत आहेत ॥ १० ॥

घरांतील जमिनी जणूं काय मोत्यें, हिरे, माणिकें इत्यादिरत्नांनीं विचित्र दिसत आहेत, तसींच सर्व भांडीं सुवर्णाचीं आहेत व ठिकठिकाणीं नानाप्रकारचे सुंदर खाण्याचे पदार्थ आहेत ॥ ११ ॥ असें झालेलें सर्व आश्चर्य पाहून सुदामाची स्त्री त्याला ह्मणते, अहो

मुक्तामणिगणैश्चित्राण्यनेकानिस्थलानिच ॥ हैमानिसर्वपात्राणिभ
क्ष्याणिविविधानिच ॥ ११ ॥ दृष्ट्वैवंचित्रमखिलंभर्तारंसाजगादह ॥
किमिदंभवनंक्षुद्रंजातमिंद्रगृहोपमम् ॥ १२ ॥ ततोऽब्रवीत्सुदामातं
वृत्तांतमखिलंनिजम् ॥ ॥ सुदामोवाच ॥ ॥ दृष्ट्वामद्विपदंकांते
सखामेयदुनायकः ॥ १३ ॥ ॥ ॥

प्राणनाथ, आपलें घर ह्मणजे पूर्वीच अगदीं क्षुद्र लहानसें झोंपडें होतें तें आज एकाएकीं इंद्राच्या घरासारखें कसें बरें झालें? ॥ १२ ॥ असें विचारतांच सुदाम्यानें आपला सर्व वृत्तांत सांगितला. सुदामा ह्मणतो हे कांते, मी द्वारकेंत गेलों त्यावेळीं माझी विपत्ति पाहून माझा मित्र जो श्रीकृष्ण ॥ १३ ॥ 

त्या दीनवत्सल प्रभूनें माझें दारिद्य दूर होण्याकरितां गर्गाचार्याकडून विधिपूर्वक मला एक व्रत सांगविलें. तें व्रत तत्काल अनुभव देणारें आहे ॥ १४ ॥ आणि थोड्या श्रमानें साध्य असून भुक्तिमुक्तिरूप फल देणारेंही आहे. तें व्रत कोणतें ह्मणशील तर तें सत्यविनायकाचें

महांसंबोधयामासयद्दीनपरवानसौ ॥ विधियुक्तंगुरुमुखात्सद्यःप्रत्ययकारकम् ॥ १४ ॥ अल्पायासेनसंसाध्यंभुक्तिमुक्तिफलप्रदम् ॥ व्रतंवैनायकंयस्यप्रभावोऽयंविराजते ॥ १५ ॥ अकल्पिताःसंपदोऽत्रदृश्यंतेस्वर्गदुर्लभाः ॥ भुंक्ष्वनिर्विण्णमनसाभजंतीविघ्ननाशनम् ॥ १६ ॥ यमामनंतिवेदांताब्रह्मणांब्रह्मणस्पतिम्॥सर्वादिपूज्यंज्येष्ठानांज्येष्ठंगणगणेश्वरम्॥१७॥

व्रत होय. त्या व्रताचा हा प्रभाव प्रत्यक्ष शोभत आहे ॥ १५ ॥ तरी त्या सत्यविनायकाची उपासना करीत, स्वर्गीयांलाही दुर्मिळ असी संपत्ति मिळाली आहे हिचा तूं उपभोग घे ॥ १६ ॥ तो प्रभु सर्व वेदांचा अधिपति व ब्रह्मस्वरूप असल्यामुळें सर्व वेदांतांनीं निरंतर वर्णित असून सर्व कार्यांच्या आरंभीं पूजा करण्यास योग्य, सर्व वरिष्ठांमध्यें महावरिष्ठ,

 

सकळ गणांचा ईश्वर ॥ १७ ॥ व बुद्धीच्या अत्यंत पलीकडे राहणारा ह्मणजे ज्याच्या स्वरूपज्ञानाविषयीं बुद्धीचें सामर्थ्य चालत नाहीं, सकळ बुद्धिचालक, ॐकारात्मक आत्मानंदाचें केवळ स्थान असा आहे, व भक्तजन त्याला अत्यंत प्रिय असल्यामुळें त्यांचीं सर्व विघ्नें तो नाहींशीं करितो ॥ १८ ॥ हे विशालाक्षि, मुख्य तात्पर्य असें समज कीं, सत्य-

बुद्धेःपरतरंतस्याश्चालकंप्रणवात्मकम् ॥ स्वानंदनिलयंभक्तप्रियोसौविघ्न नाशनः ॥१८॥ सारंविद्धिविशालाक्षितुष्टःसिद्धिविनायकः ॥ स्वयंदत्तं बहुतरमल्पमेवहिमन्यते ॥१९॥ भक्त्यासमर्पितंस्वल्पंसदेवोबहुमन्यते ॥ ततस्तौपौर्णिमायांतत्प्रतिमासंव्रतंशुभम् ॥ २० ॥

विनायक संतुष्ट झाला असतां भक्तांला आपण किती दिलें तरी तें तो थोडेंच दिलें असें मानितो ॥ १९ ॥ व लोकांनीं भक्तीनें थोडें दिलें तरी पुष्कळ दिलें असें मानितो. याप्रमाणें सुदाम्यानें स्त्रियेला या व्रताचा वृत्तांत सांगितला आणि पुढें तीं उभयतां प्रत्येक महिन्याच्या पूर्णिमेला तें शुभकारक व्रत करूं लागलीं ॥ २० ॥

त्या व्रताचरणामुळें तो ब्राह्मण सकुटुंब इहलोकीं नानाप्रकारचे सुखभोग भोगून अंतीं मोक्षाप्रत पावला ॥ २१ ॥ इति श्रीब्रह्मांडपुराणे सत्यविनायकव्रतकथामहाराष्ट्रव्याख्यायां द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥ शौनकादिऋषि सूताला ह्मणतात—हे सूतऋषे, तुमच्या मुखकमलांतून ही

चक्रातेमोदभरितौसकुटुंबस्ततोद्विजः ॥ भुक्त्वैवविविधान्भोगान्स्वानं
दंप्रतिजग्मिवान् ॥ २१ ॥ इतिश्रीब्रह्मांडपुराणेशिवपार्वतीसंवादेसत्य
विनायकव्रतोपाख्यानेद्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥ ध ॥ ॥ ऋषयऊचुः ॥ ॥
सूतत्वद्वदनांभोजात्कथांचित्रांव्रताश्रयाम् ॥ श्रृण्वंतोनहितृप्ताःस्मः
सुधयाइवमानवाः ॥ १ ॥ पुरोवदमहाभागभोःसतांरोमहर्षण ॥ ततः
किमकरोद्वैश्यःसुदाम्नःप्राप्यतद्व्रतम् ॥ २ ॥ ॥ ॥

विचित्र व्रतकथा ऐकली पण ती अत्यंत मधुर असल्यामुळें अमृतपानानें मनुष्य जसे तृप्त होत नाहींत, तसी आमचीही तेवढ्या कथेनें तृप्ति झाली नाहीं ॥ १ ॥ हे साधूंचीं अंगें रोमांचित करणाऱ्या सूता, त्या सुदाम्यापासून मणिवैश्यानें हें व्रत समजून घेतल्यावर पुढें काय केलें तें आह्माला सांग ॥ २ ॥

असें विचारतांच सूत ह्मणाले, ऋषी हो, या जगांत ज्यांच्या पदरीं पुण्य नाहीं त्यांची बुद्धि सत्यविनायकाविषयीं होणार नाहीं. तुह्मी सदाचारसंपन्न वेद पढणारे ब्राह्मण आहांत ॥ ३ ॥ मग तुह्मांला या देवाविषयीं भक्ति असेल यांत आश्चर्य तें काय ? आतां तुमच्या आज्ञेनें बुद्धीला स्फुरण झालें तेव्हां ती कथा मी जशी ऐकली आहे तशी सांगतों

सूतउवाच ॥ ॥ नह्यपुण्यवतांलोकेमतिःसत्यविनायके ॥ भवंतःसाधुचरिताब्राह्मणावेदवादिनः ॥ ३ ॥ तत्किंचित्रंभक्तिमंतःसततंब्रह्मणस्पतौ ॥ भवदाज्ञास्फुरद्बुद्धिःकथयेतांयथाश्रुताम् ॥४॥ ॥ शिवउवाच ॥ सोप्याययौस्वनगरंतदाकच्छभुजाभिधम् ॥ वृत्तांतंकथयित्वासौस्वजनान्मार्गसंभवम् ॥ ५ ॥ ॥ ॥

ती ऐका ॥ ४ ॥ शिव ह्मणतात पार्वती, सुदाम्यानें घरीं येतेवेळीं मार्गांत पूर्वीं जेव्हां व्रत केलें त्यावेळीं त्याणें तें मणिवैश्याला सांगितलें. तो वैश्य तेथून निघून आपल्या कच्छभुज नांवाच्या नगरास आला आणि त्यानें आपणाला मार्गांत घडलेला वृत्तांत पत्नीआदिकरून सर्व स्वजनांस सांगितला ॥ ५ ॥ ॥२७॥

आणि दुसरे दिवशीं त्या मणिवैश्यानें मोठ्या भक्तीनें शक्त्यनुसार सत्यविनायकाचें व्रत केलें ॥ ६ ॥ संध्याकाळीं पूजेच्या वेळीं आपले आप्त, गांवांतील अधिकारी व इतर लोक, वैदिक ब्राह्मण आणि राजाचा प्रधान ॥ ७ ॥ चित्रबाहु नांवाचा आपला मित्र या सर्वांला प्रसादाक-

परेद्दनिचकाराशुतावद्धिभवसंयुतः ॥ मणिर्भक्त्यापरमयासत्यवैनायकव्रतम् ॥ ६ ॥ सायाह्नपूजासमयेश्रेणीमुख्यान्सनागरान् ॥ ब्राह्मणान् वेदविदुषोराज्ञःप्रतिनिधिंतथा ॥ ७ ॥ चित्रबाहुंनिजंमित्रंप्रसादायसमाह्वयत् ॥ मित्रागमनहृष्टोसौतूर्णंगत्वाथतद्गृहम् ॥ ८ ॥ प्रसादमुपगृह्यासौस्वमित्रंनिजगादह ॥ ॥ चित्रबाहुरुवाच ॥ ॥ कुशलंतेप्रवसितंकच्चिद्वार्तंनिरामयम् ॥ ९ ॥ ॥ ॥

रितां बोलाविलें तेव्हां तो प्रधान, आपला मित्र मणिवैश्य फार दिवसांनीं आला ह्मणून त्याच घरीं आला आणि पूजा चालली होती तेथें बसला ॥ ८ ॥ पूजा झाल्यावर प्रसाद दिलेला घेऊन तो चित्रबाहुनामक प्रधान मणिवैश्याला ह्मणतो—मित्रा, प्रवासामध्यें सुखरूप होतास काय ? तुझा व्यापार वगैरे चांगला झालाना ॥ ९ ॥

असा कुशलपूर्वक प्रश्न करतांच मणिवैश्य 'मार्गांत आपलें सर्व द्रव्य चोरांनीं नेलें. त्यापैकीं हजार मोहरा मात्र सांपडल्या, त्यांतून पांचशें मोहरा मीं एका ब्राह्मणास दिल्या, त्याणें त्या सर्व खर्चून सत्यविनायकाचें व्रत केलें व तेंच हें व्रत ब्राह्मणाकडून मला समजलें.' वगैरे

इतिमित्रवचःश्रुत्वाकुशलप्रश्नपूर्वकम् ॥ स्ववृत्तंमार्गसंभूतंद्रव्यापायंव्रता गमम् ॥ १० ॥ कथयामाससमणिर्यावत्तावत्समागताः ॥ चोरास्तद्द्रव्य मादाय कूप्यरत्नादिसंयुतम् ॥११॥ पूर्वंनिवेदिताश्चारैःसभ्याइवतदंतिके ॥ दर्शयामासतुरथदेवमायाविमोहिताः ॥ १२ ॥ रत्नानिरत्नखचिता लंकारान्सचिवायतान् ॥ क्रयार्थंतेनतेसर्वेंपरीक्षार्थंसमर्पिताः ॥ १३ ॥

सर्व वृत्तांत चित्रबाहूस सांगितला ॥ १० ॥ तो मणिवैश्य ही गोष्ट सांगत आहे एवढ्यांत तेथें मोठा चमत्कार घडला. तो असा. ज्या चोरांनीं मणीचें द्रव्य चोरलें होतें ते चोर तें सुवर्ण रत्नादि द्रव्य घेऊन तेथें आले ॥ ११ ॥ आणि आपण कोणी व्यापारी आलों आहोंत असें नोकराकडून चित्रबाहूला कळविलें व त्याच्या परवानगीनें आंत जाऊन प्रधानाजवळ बसले.

ते चोर हुशार होते तथापि सत्यविनायकाच्या मायेनें मोहित झाल्यामुळें जवळचें जवाहिर विकावयाचें आहे ह्मणून त्यांनीं सर्व काढून चित्रबाहूला दाखविलें, तेव्हां त्यानें तें सर्व घेऊन त्याची परीक्षा व किंमत करावी ह्मणून वैश्याच्या स्वाधीन केलें. ॥ १२ ॥ १३ ॥ त्यानें तीं रत्नें व अलंकार पाहून हें आपलें द्रव्य असें ओळखून चित्रबाहूला ह्मणाला, महाराज, हे व्यापारी

मणयेसापितान्दृष्ट्वापरिचीयबभाणह ॥ चित्रबाहुमिमेचोरामदीयधनहारकाः ॥ १४ ॥ त्वयार्पितामुद्रिकेयंपूर्ववैवाहिकोत्सवे ॥ अनर्घ्यमाणिक्यमयीतामेतांस्मरताद्भवान् ॥ १५ ॥ ततःस्वीयांनिश्चिकायरुरोषसतदापरम् ॥ तावत्प्रकृतिनाज्ञातांज्ञात्वातांदस्यवःप्रिये ॥ १६ ॥

नसून चोर आहेत. यांणीं हें माझेंच द्रव्य चोरलेलें आहे ॥ १४ ॥ विशेष तर काय ! आपल्या घरीं लग्नसमारंभ झाला त्यावेळीं तुह्मी जी अमूल्य रत्नें जडलेली आंगठी मला दिलीत ती स्मरत असेल तर ही पाहा ॥ १५ ॥ असें मणिवैश्याचें भाषण ऐकून चित्रबाहूनें ती आंगठी ओळखली. आणि क्रोधानें लाल झाला. हे पार्वती, हें द्रव्य चोरीचें आहे, आह्मी चोर आहोंत असें प्रधानानें खचीत ओळखलें असें त्या चोरांनीं जाणून ॥ १६ ॥

ते फार भ्याले. आणि त्यांनीं मनांत असा संकल्प केला कीं, ज्यापेक्षां ह्या मणिवैश्याच्या व्रत-
प्रभावानें श्रुरळ पडून मालमुद्यासुद्धां आह्मी येथें पोंचलों त्याच सत्यविनायकाच्या कृपेनें निदान
हें सर्व द्रव्य घेऊन तेवढ्यानेंच जर प्रधान आह्माला सोडील ॥ १७ ॥ तर तत्काल त्याची पूजा
करूं. असी ते चोर मनांत प्रार्थना करीत आहेत तों, चित्रबाहु चोरांचें मन थरथरां कांपेल असें

भयभीताःसंदधिरेहृदयेदृष्टप्रत्ययाः ॥ सर्वंगृहीत्वाप्रकृतिर्यदिमोक्ष्यति
नोऽखिलान् ॥ १७ ॥ तदैवंपूजयिष्यामोदेवंसत्यविनायकम् ॥ ततो
सौनिजगादोच्चैस्तच्चेतःकंपयन्निव ॥ १८ ॥ ॥ चित्रबाहुरुवाच ॥ ॥
तन्नायकंहेकितवसभ्यकस्मादियंत्वया ॥ लब्धासुमुद्रिकासत्यंवदसर्वंस
हाम्यहम् ॥ १९ ॥ ॥ ॥

मोठ्यानें ओरडून ह्मणाला ॥ १८ ॥ तो त्यांतील मुख्य नायकाला ह्मणतो, हे संभावितापमाणें
वसणाऱ्या चोरा, ही आंगठी तुला कोणाकडून मिळाली खरें सांग. खरें बोललास तर तुझ्या
अपराधाची क्षमा करीन ॥ १९ ॥

नाहींपेक्षां आतांच राजाला सांगून चोरीचें पाप करणाऱ्या सर्व चोरांला मोठे दंड करीन ॥२०॥ याप्रमाणें चित्रबाहूचें भाषण ऐकून ते चोर घाबरून थरथरां कांपले आणि अडखळत ह्मणाले ॥ २१ ॥ आह्मी अमुक ठिकाणीं चोरी केली इत्यादि सर्व वृत्तांत त्यांणीं खरा सांगितला आणि

नोचेद्राज्ञेनिवेद्याशुसर्वान्वश्चोरसत्तमान् ॥ विनिशिक्षामिदंडेनमहता पापकारकान् ॥ २० ॥ इतिप्रतिनिधेर्वाचंश्रुत्वातेजातसाध्वसाः ॥ ऊचुस्तंप्रस्खलद्वाचःकंपमानांगयष्टयः ॥२१॥ सर्वंयथातथंवृत्तंनिखिलंचददुर्धनम् ॥ गृहीत्वातत्प्रतिनिधिःसर्वंदत्वामणिंप्रति ॥ २२ ॥ मुमोचचोरान्सकलान्सत्यभाषणतोषितः ॥ एवंव्रतप्रभावेनसमणिर्लब्धवान्धनम् ॥२३॥

चोरलेलें सर्व द्रव्य चित्रबाहूच्या पुढें ठेविलें. त्यानें तें घेऊन मणिवैश्याला दिलें ॥ २२ ॥ सत्यविनायकाच्या व्रताचा त्यांनीं नवस केला होता त्यामुळें ते खरें बोलले ह्मणून चित्रबाहूनें दंड न करितां त्यांस सोडून दिलें. असो. याप्रमाणें मणिवैश्याला बललेल्या ठिकाणीं सत्यविनायकाच्या कृपेनें चोरीस गेलेलें सर्व द्रव्य मिळालें ॥ २३ ॥

॥३०॥

नंतर तो मणिवैश्य अत्यंत संतुष्ट होऊन प्रत्येक महिन्याला सत्यविनायकाची पूजा करूं लागला, त्या योगानें इहलोकांतील नानाप्रकारचे भोग भोगून शेवटीं आनंदभुवनाप्रत पावता झाला ॥ २४ ॥ ब्रह्मदेव ह्मणाले नारदा, मणिवैश्याला या व्रताचा अनुभव आलेला पाहून चित्रबाहु प्रधानानें आपणास सुंदर पुत्रप्राप्ति व्हावी ह्मणून सत्यविनायकाच्या व्रताचा नवस केला ॥२५॥

ततोऽतिहृष्टमनसाप्रतिमासंपुपूजह ॥ भुक्त्वासविविधान्भोगान्क्र
मात्स्वानंदमेयिवान् ॥ २४ ॥ ॥ ब्रह्मोवाच ॥ ॥ ततोदृष्टप्रत्ययो
सौप्रधानोहृदिनारद ॥ व्रतंसंमानयामाससुपुत्रावाप्तयेपरम् ॥ २५ ॥
लब्ध्वासुपुत्रंमुदितोविसस्मारव्रतंशुभम् ॥ ततोविघ्नाभिभूतःसराज्ञा
स्वल्पापराधतः ॥ २६ ॥ ॥ ॥

तेवढ्यानें ईशकृपेनें त्याला पुत्र झाला. त्यायोगानें आनंदित झाला, पण त्या आनंदभरांत सत्य-विनायकाला विसरला. थोडे दिवस गेल्यावर त्याजवर फारच विघ्नें येऊन कोसळलीं. थोडक्याच अपराधावरून राजानें ॥ २६ ॥ ॥३०॥

त्याचें सर्वस्व हरण करून त्याला नगरांतून बाहेर घालवून दिला. शंकर ह्मणतात पार्वति, चित्रबाहु नगरांतून निघाला तो रेवा नदीच्या तीरीं जाऊन तेथें भिक्षा मागूं लागला. एके दिवशीं भिक्षेकरितां फिरतांना शुकाचार्यांच्या आश्रमांत पोंचला ॥ २७ ॥ शुकमुनीला पाहतांच साष्टांग नमस्कार करून दुःखानें रडूं लागला तेव्हां याला असें महादुःख कशानें झालें तें मुनीनें समा-

पुरात्सर्वस्वमादाययय़ौनिष्कासितोबहिः ॥ रेवातीरेचरन्भिक्षांगिरिपु
त्रिशुकाश्रमम् ॥ २७ ॥ नत्वामुनिवरंदुःखाच्चित्रबाहूरुरोदह ॥ ध्याने
नालोक्यतस्यागःसमुनिस्तंजगादवै ॥ २८ ॥ श्रीशुकउवाच ॥ ॥
मारोदीश्चित्रबाहोत्वंस्मरसत्यविनायकम् ॥ सर्वादिपूज्यंसर्वैश्चपुत्रार्थे
मानितंपुरा ॥ २९ ॥ ॥ ॥ ॥

धींत पाहिलें आणि तो त्याला ह्मणाला ॥ २८ ॥ हे चित्रबाहो, रडूं नको. सर्व कर्मांत ज्याची पहिल्यानें पूजा करतात त्या सत्यविनायकाचें स्मरण कर, पूर्वी तूं ज्याचेपाशीं पुत्रप्राप्तीसाठीं नवस केला होतास ॥ २९ ॥

 शिव ह्मणतात पार्वति, शुकानें आठवण केल्याबरोबर त्याला सरलें आणि तसेंच स्त्रीपुत्रांसह तें 
॥३१॥ व्रत केलें. ॥ ३० ॥ नंतर त्या व्रताच्या प्रभावानें आपण प्रधानाला निरपराधी घालविला हें
योग्य नाहीं. असें धर्मकीर्ति राजाला वाटून त्यानें मोठ्या सन्मानानें त्या प्रधानाला पुनः बोला-

॥ श्रीशिवउवाच ॥ ॥ इतिसंस्मारितस्तेनव्रतंसस्मारविस्मृतम् ॥ ततो
दारापुत्रयुतश्चक्रेतत्रैवतत्पुनः ॥३०॥ ततोव्रतप्रभावेनतद्राज्ञाधर्मकीर्ति
ना ॥ विचार्यबहुमानेनसमाहूतःसमाययौ ॥ ३१ ॥ राज्ञःप्रीतिंपरांप्राप्यां
तेतत्स्थानमगान्मुदा ॥ तेपिचोराःसमायाताःस्वदेशंमगधाभिधम् ॥३२॥

विलें तेव्हां तो घरीं आला ॥ ३१ ॥ आणि राजाची प्रीति झाल्यामुळें त्याला प्रधानाची जागा ॥३१॥
पुनः मिळाली, आणि इहलोकींचें सौख्य भोगून अंतीं मोक्षालाही पावला. इकडे ते चोरही
मणिवैश्याचें द्रव्य सर्व देऊन शिक्षा वगैरे कांहीं न होतां ते आपल्या मगधदेशाला गेले ॥३२॥

आणि त्या वेळेपासून त्यांनीं चोरी सोडली व सदाचारसंपन्न झाले आणि देवाच्या प्रसादानें त्यांची बुद्धि चांगली झाली. शिव ह्मणतात प्रिये, नंतर त्यांनीं पूजेची सामग्री तयार करून फल्गु नदीच्या तीरावर गेले ॥ ३३ ॥ व तेथें केळींचें मखर व सुंदर मंडपिका करून मोठ्या भक्तीनें

त्यक्तचौर्याःसदाचारास्तत्प्रसादात्सुबुद्धयः ॥ तदासंभृतसंभाराफल्गोस्ती रेसुशोभने ॥ ३३ ॥ कृत्वामंडपिकांचारुकदलीस्तंभमंडिताम् ॥ पुपूजुः परयाभक्त्यादेवंसत्यविनायकम् ॥ ३४ ॥ ॥ इतिश्रीब्रह्मांडपुराणेशिव पार्वतीसंवादेसत्यविनायकोपाख्यानेतृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥ ॥ ॥
॥ श्रीशिवउवाच ॥ ॥ तत्राकस्माद्ययौकाचिल्ललनारुदतीभृशम् ॥ दुःखार्ताम्लानवदनावदान्याजीवितेस्वके ॥ १ ॥ ॥ ॥

सत्यविनायकाची पूजा केली ॥ ३४ ॥ इति श्रीब्रह्मांडपुराणे सत्यविनायककथामहाराष्ट्रभाषा-व्याख्यायां तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥ शिव ह्मणाले पार्वति, ते चोर फल्गूच्या तीरीं पूजा करित होते एवढ्यांत दुःखानें म्लानवदन झालेली व आपल्या जीवितावरसुद्धां उदार झालेली कोणी-एक महिला रडत तेथें आली ॥ १ ॥

तेव्हां तिला पाहून तेथें पूजा सांगणारा भार्गव नांवाचा वेदवेत्ता ब्राह्मण होता व तो परदुःखासहिष्णु होता त्यामुळें दयेनें कळवळून तो तिला ह्मणतो ॥ २ ॥ हे कृशांगि, तूं कोण व कोणाची आहेस ? तूं कोठून आलीस ? हे कल्याणरूपे, तुला दुःख कोणतें आहे तें मला सांग सत्यवि-

तांनिरीक्ष्यतथाभूतांभार्गवोवेदविद्द्विजः ॥ परदुःखासहिष्णुस्तद्व्रताचार्योजगादह ॥ २ ॥ ॥ भार्गवउवाच ॥ ॥ कासिकस्यासितन्वंगिकुतोत्रागमनंतव ॥ किंदुःखंवदकल्याणिहरतांतद्विनायकः ॥ ३ ॥ इतितद्वाक्यमाकर्ण्यकिंचिद्धर्षवतीसती ॥ द्विजवाग्जातविश्वासास्ववृत्तंसाजगादह ॥ ४ ॥ ॥ सोवाच ॥ ॥ चंद्रसेनाह्वयःश्रीमान्राजामालवदेशपः ॥ वदान्योधर्मसंपन्नस्तेजस्वीसंशितव्रतः ॥ ५ ॥ ॥ ॥

नायक तें निवारण करील ॥ ३ ॥ हें भार्गवाचें दयार्द्र भाषण ऐकून तिला किंचित् हर्ष वाटला व त्याच्या भाषणावर तिचा विश्वास बसून ती त्याला आपला वृत्तांत सांगूं लागली ॥ ४ ॥ ती ह्मणाली, अहो ब्राह्मणश्रेष्ठा, चंद्रसेन ह्मणून माळवा देशाचा राजा आहे. तो मोठा दाता, धर्मसंपन्न, कडकडीत व्रतें करणारा ॥ ५ ॥

धर्मात्मा, सत्यवादी, वेदशास्त्रांचें तत्व जाणणारा, असा सर्व लक्षणसंपन्न असून त्याचेजवळ चतुरंग सैन्य विपुल आहे. ॥ ६ ॥ तो पृथ्वीचें रक्षण करीत असून सर्व प्रजांचें औरसपुत्रांप्रमाणें पालन करीत आहे. त्याची सुशीला नांवाची मी स्त्री आहें, मला पुत्रसंतान नाहीं ॥ ७ ॥ याकरितां त्यानें दुसरी स्त्री वरली. तिचें नांव मदनावती आहे आणि सर्व जाणणारे असे गुण-

धर्मात्मासत्यवचनोवेदशास्त्रार्थतत्त्ववित् ॥ चतुरंगबलोपेतःसर्वलक्षण
लक्षितः॥६॥ रक्षितावसुधांसर्वांप्रजाःपुत्रानिवौरसान्॥तस्याहंमहिषीना
म्नासुशीलापुत्रवर्जिता ॥७॥ अतःपरावृताजायानाम्नासामदनावती ॥
गुणवान्नीतिवांश्चोभौप्रधानौसर्ववित्तमौ ॥ ८ ॥ सुनीतिकुशलौयस्यका
र्तिकेयपराक्रमौ ॥ समेभर्तावशंनीतःसपत्न्याश्यामयाकिल ॥ ९ ॥ ॥

वान् व नीतिमान् नांवांचे त्याचे दोन प्रधान आहेत. ॥ ८ ॥ ते न्यायांत प्रवीण असून कार्तिकस्वामीप्रमाणें महापराक्रमी आहेत. हें सर्व ठीक आहे, परंतु हल्लीं वरलेल्या त्या षोडशवर्षात्मक मदनावतीनें राजाला अगदीं वश केला आहे ॥ ९ ॥

॥३३॥

नाना अलंकार धारण केलेल्या त्या तरुणीशीं रात्रंदिवस राजा रममाण झालेला असतो. राजाला तिचा वियोग क्षणमात्र सोसत नाहीं ॥ १० ॥ तो माझा निरंतर धिक्कार करितो मीं कांहीं सांगितलें तरी मुळीं ऐकत नाहीं. मजकडे नेहेमीं रागानें पाहतो. मी कोणतीही वस्तु दिली तरी घेत नाहीं ॥ ११ ॥ मी त्या सवतीचें केवळ दास्य करून घरांत दुःख भोगित राहिलें

रमतेऽहर्निशंसोपिनानालंकारभूषया ॥ नवियोगंहिसहतेक्षणमात्रंतया क्वचित् ॥१०॥ मांधिक्करोतिसततंनशृणोतिचमद्वचः ॥ रुषामामीक्षतेनित्यंनगृह्णातिमयार्पितम्॥११॥तस्यादास्यंविधायाहंस्थितावेश्मनिदुःखिता ॥तस्यांतस्याभवत्सूनुःसपत्न्यांचारुलोचनः॥१२॥ चकारजातकर्मास्यविधितोनामचाकरोत्॥द्विजेरितःपद्मसेनइत्थंसववृधेततः॥१३॥ शुक्लचंद्रइव श्रीमानष्टमेव्रतबंधनम् ॥ समाप्तविद्यंतंपश्चान्मद्रनाथःसुतांददौ ॥ १४॥

तशांत तिला राजापासून सुंदर पुत्र झाला॥१२॥ त्यावेळीं राजानें त्याचें यथाविधि पुत्रावण केलें, व नामकरणसमयीं ब्राह्मणांनीं सांगितल्यावरून त्याचें पद्मसेन असें नांव ठेवलें. नंतर तो ॥१३॥ शुक्लपक्षांतील चंद्राप्रमाणें वाढूं लागून मोठा झाला. राजानें आठवे वर्षीं त्याची मुंज बांधली. ॥३३॥

पुढें गुरूच्या घरीं राहून तो सर्व विद्या शिकला. नंतर मद्रदेशाच्या राजानें त्या पद्मसेनाला आपली कन्या विवाह करून दिली ॥ १४ ॥ हे द्विजश्रेष्ठा, नंतर कांहीं दिवसांनीं माझा पति तो चंद्रसेन गयेच्या यात्रेकरितां आपल्या सर्व परिवारासहवर्तमान सांप्रत येथें आला ॥ १५ ॥ त्यांत त्याची आज सर्व यात्रा समाप्त झाली, तेव्हां तो श्रमल्यामुळें मंचकावर जाऊन निजला.

ततःकतिपयाहःसुराजामत्प्राणवल्लभः ॥ गयायात्रार्थमायातःपरिवारयु
तोद्विज ॥ १५ ॥ अद्ययात्रांसमाप्यासौश्रांतःसुष्वापमंचके ॥ सपत्नींतं
सेवयितुंगतातच्चरणांतिके॥१६॥ मांवीक्ष्यसाकलुषिताप्रपदेनाहनद्रुषा ॥
ततोतिदुःखिताहीणाप्राणत्यागायसंगता ॥१७॥ भर्तानमनुतेयांतांनको
पिमनुतेकदा ॥ अतःकिंजीवितेनाथशोषयामिकलेवरम् ॥ १८ ॥

एवढ्यांत ती माझी सवत राजाची सेवा करण्याकरितां त्याच्या पायांजवळ आली ॥ १६ ॥ आणि मला तेथें असलेली पाहून अगदीं कलुषित झाली आणि तीनें मोठ्या रागानें मला लाथ मारली. त्यामुळें मी असह्य दुःखानें पीडित होऊन प्राणत्यागाला उद्युक्त झालें आहें ॥ १७ ॥ हे द्विजवरा, ज्या स्त्रीला तिचा पति मानीत नाहीं तिला दुसरें कोणही मानीत नाहीं, तेव्हां

अशा वांचण्यानें काय उपयोग ! त्यापेक्षां अरण्यांत जाऊन उपोषणादिकांनीं शरीरशोषण करावें हें बरें ॥ १८ ॥ अथवा विष प्यावें. अथवा पाण्यांत उडी टाकून जीव द्यावा असे अनेक विचार करित आहें, पण अमुकच करावें असा अद्यापि मनाचा निश्चय न झाल्यामुळें फिरत फिरत येथें



पास्येविषंपतेयाप्सुनमनोयातिनिश्चयम् ॥ एतस्मिन्नंतरे दृष्टंभवत्पाद युगंशुभम् ॥ १९ ॥ किमिदंक्रियतेसर्वैःकोवादेवःप्रपूज्यते ॥ किंफलं लभतेह्यस्माद्धदविप्रदयानिधे ॥ २० ॥ अहमप्याचरिष्यामियदिपूर्ण मनोरथा ॥ निशम्यतस्यास्तांवाणींसदयःपरिदेविनीम् ॥ २१ ॥

आलें एवढ्यांत दैवयोगानें आपलें चरणयुगुल दृष्टीस पडलें ॥ १९ ॥ हे करुणासागरा ब्राह्मणा, येथें सर्व लोक मिळून हें काय करीत आहेत ! कोणत्या देवाची पूजा चालली आहे ? व यापासून कोणतें फल प्राप्त होतें ? तें कृपा करून सांगा ॥२०॥ कारण जर माझा मनोरथ पूर्ण होईल तर मीही व्रताचरण करीन. अशी त्या राजपत्नीची दीनवाणी ऐकून ॥ २१ ॥

तो भृगुश्रेष्ठ त्या सुनीतेला सत्यविनायकव्रताचा वृत्तांत सांगता झाला. तो ह्मणतो. हे राजपत्नि, हे जमलेले लोक पूर्वी चोर असून सत्यविनायकाच्या प्रसादानें चोरीचा त्याग करून सद्बुद्धि झाले आहेत ॥ २२ ॥ व यांनीं सद्वर्तनानें संपत्ति जोडली आहे. सत्यविनायकाच्या कृपेनें यांचे मनोरथ पूर्ण झाले आहेत ह्मणून हे आज व्रतस्थ होऊन भक्तीनें त्याची पूजा करीत आहेत ॥२३॥

तद्वृत्तमखिलंतस्यैबभाषेभार्गवाग्रणीः॥ ॥ भार्गवउवाच ॥ संन्यस्तचौर्याचरणैस्तत्प्रसादात्सुबुद्धिभिः॥२२॥ स्ववृत्तोपात्तसुधनैरेभिःपूर्णमनोरथैः॥ व्रतस्थैःपूज्यतेभक्त्यादेवःसत्यविनायकः॥२३॥ ततस्त्वनन्यशरणमादिदेशव्रतंशुभम्॥ददौप्रसादंतांसर्वंक्षीरपाकविनिर्मितम्॥२४॥ भुक्त्वाप्रसादंसातत्रयातास्वस्थानिजंस्थलम्॥ ध्यायंतीसर्वदाचित्तेप्रभुं सत्यविनायकं २५

याप्रमाणें भार्गवानें त्या राजपत्नीला चोरांचा वृत्तांत सांगून या अनन्यशरण अशा शुभकारक व्रताचा विधि सांगितला. आणि दूध आटवून बनविलेला खव्याचा प्रसाद तिला दिला ॥२४॥ तो त्या सुनीतेनें तेथेंच भक्षण करून स्वस्थपणें आपल्या जागीं गेली. व निरंतर मनामध्यें सत्यविनायकाचें चिंतन करूं लागली ॥ २५ ॥

इकडे ते चोरही व्रत करून आपापल्या घरीं गेले आणि पुढें ते सत्यविनायकाच्या कृपेनें नानाप्र-
कारचे यथेच्छ भोग भोगून दुसऱ्या जन्मांत ब्राह्मणत्व पावून शुद्धात्मे होत्साते शेवटीं मोक्षाला
॥३५॥ पावले ॥२६॥ इति श्रीब्रह्मांडपुराणे सत्यविनायककथामहाराष्ट्रभाषाव्याख्यायां चतुर्थोऽध्यायः ॥४॥
पार्वती ह्मणते हे देवदेवा, हे जगन्नाथ, हे करुणाकरा, हे महेश्वरा, ती सुनीता राजपत्नी भार्गवा-

तेपिचोराव्रतवशाद्भुक्त्वाभोगान्मनोगतान् ॥ शुद्धात्मानःक्रमात्सर्वेब्रा
ह्मणाअन्यजन्मनि॥२६॥ ॥इतिश्रीब्रह्मांडपुराणेशिवपार्वतीसंवादेसत्यवि
नायकोपाख्यानेचतुर्थोऽध्यायः ॥४॥ पार्वत्युवाच ॥ ॥ देवदेवजगन्नाथ
महेशकरुणाकर ॥ परावृत्त्यपरंब्रूहिकथमाचरितंव्रतम् ॥ १ ॥ प्रियाप्रश्नंस
माकर्ण्यजगादभगवान्हरः ॥ श्रीशिवउवाच ॥ ॥ समाप्ययात्रांस
ययौनृपःकर्णावतंपुरम् ॥ २ ॥

कडून व्रताचा विधि समजून घेऊन घरीं गेल्यावर तिनें तें व्रत कसें केलें तें मला सांगा ॥ १ ॥ ॥३५॥
असा पार्वतीचा प्रश्न ऐकून षड्गुणैश्वर्यसंपन्न शंकर ह्मणाले हे प्रिये, तो चंद्रसेन राजा गयायात्रा
समाप्त करून सर्व परिवारासह आपल्या कर्णावत नांवाच्या नगराला आला ॥ २ ॥

आणि पूर्वींप्रमाणें आपलें राज्य पालन करूं लागला. व तो स्वधर्मानें वागत असल्यामुळें त्यानें चांगलें यश मिळविलें. व सुनीतेनें सत्यविनायकाचा प्रसाद भक्षण केला आणि ती निरंतर त्याचें चिंतन करीत होती त्या योगानें ॥३॥ त्या राजाच्या बुद्धीला फेर पडला. सुनीता त्याला अप्रिय झाली होती पण आतां ती त्याला सद्गुणी असून साध्वी आहे असें वाटूं लागलें आणि तो तिच्यावर प्रीति करूं लागला, याप्रमाणें अनुभव येतांच तिनें आपला कुलगुरु भरद्वाजमुनि

स्वराज्यंपालयामासधर्मेणयशआप्तवान् ॥ नित्यंविनायकध्यानात्तत्प्रसादस्यभक्षणात् ॥३॥ बुद्धिभेदोबभूवास्यप्रियांमेनेसतीमपि ॥ ततोदृष्टप्रत्ययासाभरद्वाजंमुनिंगुरुम् ॥ ४ ॥ समाहूयजगादाथव्रतावाप्तिकथांनिजाम् ॥ सोप्याहतांमयाप्येतन्मंगलायोपदेशितम् ॥५॥ ततस्तेनव्रतेनाप्तंमानुष्येप्यमृताशनम् ॥ एवंज्ञातप्रभावासासद्यस्तद्व्रतमारभत् ॥ ६ ॥

याला ॥ ४ ॥ बोलावून आपली सर्व हकीगत सांगितली, तेव्हां भरद्वाज तिला ह्मणाला हे राजपत्नि, पूर्वीं हें व्रत मी मंगळाला सांगितलें ॥ ५ ॥ त्यानें तें व्रत केलें त्यामुळें त्याला या मनुष्यलोकींही अमृत प्राशनाला मिळालें, असा त्यानें व्रताचा प्रभाव सांगतांच तिणें तत्काळ सर्व सामग्री तयार करून व्रत करण्यास आरंभिलें ॥ ६ ॥

आणि संध्याकाळीं पूजा करण्यासाठीं गुरूकडून आपल्या पतीला ( चंद्रसेनाला ) बोलाविलें, राजा जाण्यास निघाला, जातेवेळीं कनिष्ठपत्नी मदनावतीला ह्मणाला ॥ ७ ॥ हे प्रिये, आज आपली सुनीता सत्यविनायकाच्या व्रताचा उत्सव करीत आहे तो पाहण्याकरितां तूं माझ्या-बरोबर चल. हें ऐकून मदनावती ह्मणाली, माझ्या पोटांत शूलव्यथा होत आहे. मी तिकडे येत

सायंपूजाविधानायगुरुणापतिमाह्वयत् ॥ प्रेक्ष्यव्रतंनृपोयास्यन्प्राहासौ मदनावतीम् ॥ ७ ॥ याहिप्रियेमयाद्रष्टुंविनायकव्रतोत्सवम् ॥ साहनो याम्यहंतत्रभृशंशूलवतीभवान्॥८॥प्रयात्वद्दष्टकुतुकस्तथापित्वरितंययौ॥ गुर्वाज्ञयाशापभीतस्ततःपतिपुरःसरा ॥ ९ ॥ विधायपूजांश्रुत्वातुकथां साद्विजदंपती ॥ संभोज्यमानयामासदक्षिणाभूषणांशुकैः ॥ १० ॥

नाहीं. ॥ ८ ॥ असले उत्सव आपल्या दृष्टीस कधीं पडत नाहींत ह्मणून आपणच तिकडे जावें. असें ती खोंचून बोलली तरी तिकडे लक्ष न देतां राजा गुरूच्या आज्ञेचें उल्लंघन केलें तर तो शाप देईल या भीतीनें सुनीतेकडे गेला. नंतर सुनीतेनें पतीसह बसून ॥९॥ सत्यविनायकाची पूजा केली, कथा ऐकली, ब्राह्मणदंपतीला भोजन घालून दक्षिणा, वस्त्रें, भूषणें देऊन त्यांचा सन्मान केला १०

आणि सुवासिनींला हळद कुंकूं, चोळ्या, अर्गजा, बुक्का, अत्तरें इत्यादि देऊन त्यांचा सन्मान केला ॥ ११ ॥ नंतर हे पार्वति, अनेक प्रकारच्या पक्वान्नांनीं युक्त दुधाच्या खव्याचा केलेला प्रसाद सर्व आप्तांसहवर्तमान तिनें भक्षण केला ॥ १२ ॥ नंतर सारी रात्र प्रभूच्या नांवाचा जप करीत वेश्यांचीं गाणीं, नृत्य, नाटकें, ललितें ॥ १३ ॥ पुराणचर्चा, नानाप्रकारचीं भगवद्गुणांचीं

सुवासिनीःसमानर्च कंचुकीकुंकुमादिभिः ॥ सुगंधचूर्णतैलाद्यैस्ततः

प्रीत्यासुहृज्जनैः ॥११॥ ततःप्रसादंसाखर्वक्षीरपाकविनिर्मितम् ॥ नाना

भोज्यसमायुक्तंबुभुजेतंवरानने ॥१२॥ ततश्चक्रेजागरणंजपंतीविभुना

मसा ॥ वारांगनानृत्यगीतैरूपकैर्विविधैःशुभैः ॥ १३ ॥ पुराणचर्ययाना

नाभगवद्गुणकीर्तनैः ॥ तद्व्रतस्यप्रभावेणरेमेतत्रैवभूपतिः ॥१४॥ दिनानि

कतिचित्तस्याविनयेनवशीकृतः ॥ लेभेगर्भंततोराज्ञीश्रीविनायकतोषतः १५

कीर्तनें करून जागरण केलें, त्या व्रताच्या प्रभावानें राजा तेथेंच रमला ॥१४॥ तो कांहीं दिवस-पर्यंत तिच्या विनयानें व सद्वर्तनानें लुब्ध होऊन तेथें राहिल्यामुळें सत्यविनायकाच्या कृपेनें सुनीता गर्भवती झाली ॥ १५ ॥

दुसरें असें घडलें कीं, व्रताच्या दुसरे दिवशीं ती साध्वी सुनीता, शिल्लक राहिलेला प्रसाद घेऊन सपत्नीच्या ( मदनावतीच्या ) घरीं गेली आणि तिनें प्रेमानें तिला तो प्रसाद दिला ॥ १६ ॥ परंतु ती दुःस्वभावाची सुनीतेला पाहून मनांत फार रागावली आणि तिच्याकडचा प्रसाद घेऊन आपल्या मंदिरांतून तिला घालवून दिली ॥ १७ ॥ आणि तो प्रसादही रागानें दूर फेंकून

ततःशिष्टंप्रसादंतंसमादायसमाययौ ॥ सपत्न्यामंदिरंसाध्वीतांददौप्रेम
संयुता ॥ १६ ॥ सादुष्टभावातांवीक्ष्यरुरोषसुभृशंहृदि ॥ तस्याःप्रसाद
मादाय मंदिरान्निरवासयत् ॥ १७ ॥ प्रसादमपितंरोषाद्दूरंत्यक्तवती
खला ॥ रुष्टासुष्वापसामंचकोणेस्वांचलसंवृता ॥ १८ ॥ नममर्षसमा
यातांपतिप्रणयसंयुतां ॥ प्रसादस्यापमानेनतद्भक्तायाश्छलेनच ॥ १९ ॥

दिला व आपण आपल्या पलंगाच्या एका कोपऱ्यास पदराचा बुरखा घेऊन निजली ॥ १८ ॥ सुनीतेवर पतीचें प्रेम झालेलें व ती उत्कर्षानें आपलेकडे आली हें तिला सहन झालें नाहीं, असो- इकडे प्रसादाचा अवमान व देवभक्त अशा साध्वीचा छळ केला त्या योगानें ॥ १९ ॥

॥३७॥

त्याच रात्रीं तिच्या सर्वांगाला कुष्ठ उत्पन्न झालें तें सकाळीं चंद्रसेनराजानें पाहतांच त्या कुटिल मदनावतीचा त्याग केला आणि सुनीतेशीं प्रेमानें वागूं लागला ॥ २० ॥ पुढें सुनीता पूर्ण दिवस भरतांच पांच ग्रह उच्चीचे अशा शुभसमयीं प्रसूत झाली व पुत्र झाला ॥ २१ ॥ राजाला

जातांकुष्ठयुतांदुष्टांप्रातस्तांवीक्ष्यभूपतिः ॥ जहौनिर्भर्त्स्यकुटिलांसुनया
निरतोभवत् ॥२०॥ सुषुवेसासुतंसुभ्रूःपंचोच्चग्रहमंडिते ॥ शुभेमुहूर्तेराजा
पिददौदानानिरिभूरिशः ॥२१॥ ब्राह्मणेभ्यःपुत्रजन्महृष्टचित्तोयथार्हतः॥
कृत्वातज्जातकर्मादिज्योतिर्विदनुमोदितः ॥ २२ ॥ चक्रेलक्षप्रदंनाम्ना
भूषयामासभूषणैः ॥ अतिप्रीतिमतीसाध्वीसुनीतात्वभवत्तदा ॥ २३ ॥

पुत्रजन्मनिमित्त मोठा आनंद झाला आणि त्यानें ब्राह्मणांला पुष्कळ दानें दिलीं, ज्योतिष्यांच्या अनुमोदनानें त्या मुलाचा जातकर्मसंस्कार केला ॥ २२ ॥ त्या मुलाचें नांव लक्षप्रद ठेविलें. आणि त्याला अलंकारांनीं मंडित केला त्या योगानें सुनीतेला मोठा आनंद झाला ॥ २३ ॥

॥३८॥

आणि पुढेंही निरंतर ती सत्यविनायकाची सेवा करूं लागली. शिव ह्मणतात पार्वती, इकडे मदनावती सत्यविनायकाच्या व त्या साध्वीच्या अवमानानें सर्वांगाला कुष्ठ होऊन रोगग्रस्त व व्याकुळ झाली ॥ २४ ॥ असा परिणाम होतांच तिला कृतकर्माचा पश्चात्ताप झाला आणि ती सुनीतेला शरण गेली. तेव्हां ती सुशीला सुनीता मदनावतीला ह्मणाली, अग

सिषेवेऽहर्निशंभक्त्याप्रभुंसत्यविनायकम् ॥ ॥ शिवउवाच ॥ ॥
बभूवातितरांरुग्णाखिन्नासामदनावती ॥ २४ ॥ पश्चात्तापवतीपश्चा
त्सपत्नीं शरणंययौ ॥ तामाहसासाधुशीलाभजसत्यविनायकम् ॥२५॥
प्रसादस्यापमानेनदुःखभाक्त्वंवरानने ॥ ततोगुरुंसमाहूयनतास्वपतिना
सह ॥२६॥ सपत्न्याश्चैवपप्रच्छावमानाघहरंशुभम् ॥ उपायंसततस्तस्याः
सौहार्दपरितोषितः ॥ २७ ॥ ॥ ॥ ॥

मदनावती, तूं सत्यविनायकाचें पूजन कर ॥ २५ ॥ हे वरानने, प्रसादाच्या अवमानानें तुला हें दुःख भोगावें लागलें. नंतर सुनीतेनें गुरूला बोलावून पतीसह त्याच्या पायां पडली ॥२६॥ आणि त्याला आपल्या सवतीनें केलेल्या प्रसादावमानरूप पापाच्या परिहारार्थ उपाय विचा- ॥३८॥

रला, तेव्हां तो तिच्या साधुशीलानें संतुष्ट झाला ॥ २७ ॥ आणि पूर्वी चंद्रानें केलेल्या अपराधाच्या क्षमापनार्थ सत्यविनायकाचें व्रत केलें होतें तें तिला सांगितलें. आणि तिला ह्मणाला हे सुंदरि, ज्याच्यापूर्वी जयशब्द व अंतीं विनायकशब्द अशीं ॥ २८ ॥ विनायकाचीं सुमुखादिक निरनिराळीं बारा महिन्यांतील बारा नांवें आहेत त्यांचा उच्चार करून व त्या दिवशीं

कथयामासचंद्रेणसापराधेनसाधितम् ॥ नामानिसुमुखाद्यानिजयपूर्वाणि सुंदरि ॥ २८ ॥ नित्यंविनायकांतानिप्रतिमासंपृथक्पृथक् ॥ यावत्कार्यं भक्षणाद्यंपूर्वमुक्त्वाकुरुष्वतत् ॥ २९ ॥ व्रतंचकारयामासपुनःपत्यातदर्थ तः ॥ तद्व्रतस्यप्रभावेणसापिरोगोज्झिताभवत् ॥ ३० ॥ ततोदृष्टप्रभावो सौचंद्रसेनोनृपोत्तमः ॥ प्रतिमासंपुपूजैनंदेवंसत्यविनायकम् ॥ ३१ ॥

जें कांहीं भक्षणादिक करावयाचें असेल त्याचा पूर्वी संकल्प करून तूं व्रत कर ॥ २९ ॥ असें ह्मणून भरद्वाजानें मदनावतीकरितां सुनीतेकडून पुनः सत्यविनायकाचें व्रत करविलें. त्या व्रताच्या प्रभावानें ती रोगापासून मुक्त झाली ॥ ३० ॥ याप्रमाणें या व्रताचा प्रभाव प्रत्यक्ष पाहिलेला तो चंद्रसेनराजा प्रत्येक महिन्याला सत्यविनायकाची पूजा करूं लागला ॥ ३१ ॥

॥३९॥

आणि त्या दोघी स्त्रियांसह नियमानें राहिला. पुढें त्यानें सुवर्णाचें रत्नजडित मंदिर बांधलें ॥ ३२ ॥ आणि त्यांत सत्यविनायकाची स्थापना केली. मंदिरापुढें गुर्वाज्ञाउल्लंघनदोष हरणारें असें शुद्धतीर्थ तयार केलें ॥ ३३ ॥ व तेव्हांपासून तें कर्णावतनगर सर्व पृथ्वींत प्रसिद्ध झालें. आणि तो चंद्रसेनराजा सत्यविनायकव्रताच्या सामर्थ्यानें देवांलाही दुर्लभ असे अनेक

नित्यंनियमसंयुक्तस्ताभ्यांस्त्रीभ्यांबभूवह ॥ कृत्वादेवालयंचारुसौवर्णंर त्नभूषितम् ॥ ३२ ॥ तन्मध्येस्थापयामासदेवंसत्यविनायकम् ॥ तत्पु रस्तीर्थममलं गुरोरुल्लंघनाघहम् ॥ ३३ ॥ चक्रेततःपप्रथेतद्भुविकर्णाव तंपुरम् ॥ भुक्त्वासविविधान्भोगानीप्सितान्देवदुर्लभान् ॥ ३४ ॥ पुत्रेराज्यंविनिक्षिप्यस्त्रीभ्यांकांतारमाविशत् ॥ व्रतप्रभावाच्छुद्धात्मायो गसाधनतत्परः ॥ ३५ ॥

प्रकारचे भोग यथेच्छ भोगून ॥ ३४ ॥ अंतीं वृद्धपणीं पुत्रावर राज्यभार संपवून दोनी स्त्रियां- ॥३९॥
सहवर्तमान वानप्रस्थाश्रमाकरितां गेला. आणि व्रताच्या प्रभावानें तो राजा शुद्धांतःकरण होऊन योगसाधनाविषयीं तत्पर झाला ॥ ३५ ॥ व आयुष्याच्या अंतीं दोनी स्त्रियांसहवर्तमान

सत्यविनायकाच्या सायुज्यमुक्तीला पावला. तात्पर्य असें कीं जो मनुष्य हें अत्यंत दुर्लभ व्रत करील ॥ ३६ ॥ आणि इहलोकीं भोग व परत्र मोक्ष देणाऱ्या पुण्यकारक या कथेचें जो श्रवण करील त्याचे सर्व मनोरथ सत्यविनाकाच्या कृपेनें तत्काल पूर्ण होतील ॥ ३७ ॥ हे पार्वति, या व्रतानें पुत्रार्थी असेल त्याला पुत्र होईल, धनार्थी असेल त्याला धन

स्वानंदमायुषोंतेसयर्यौसत्यविनायकम् ॥ इदंव्रतंयःकुरुतेनरःपरमदुर्ल
भम् ॥ ३६ ॥ शृणुयाच्चकथांपुण्यांभुक्तिमुक्तिप्रदायिनीम् ॥ सर्वान्कामा
नवाप्नोतिसद्यःसत्यविनायकात् ॥ ३७ ॥ पुत्रार्थीलभतेपुत्रान्धनकामो
लभेद्धनम् ॥ भार्यार्थीलभते भार्यांव्रतीसद्योनगात्मजे ॥ ३८ ॥ अंतेस्वा
नंदमाप्नोतिभुक्त्वाभोगान् मनोगतान् ॥ ॥ पार्वत्युवाच ॥ ॥ वरदा
यांकथंसेव्यःप्रसादोव्रतिनाशिव ॥ ३९ ॥

मिळेल, स्त्रियेची इच्छा असेल त्याला उत्तम स्त्री मिळेल ॥ ३८ ॥ आणि त्याचे इहलोकींचे सर्व मनोरथ पूर्ण होऊन अंतीं तो स्वानंदभुवनाप्रत प्राप्त होईल. हें ऐकून पार्वती ह्मणाली हे शंकरा, हें व्रत भाद्रपदशुद्ध चतुर्थीला करावें असें आपण सांगितलें परंतु तो उपोषणाचा दिवस असल्यामुळें त्यादिवशीं प्रसाद भक्षण कसा करावा तें सांगा ॥ ३९ ॥ हा पार्वतीचा प्रश्न

॥४०॥ ऐकून शंकर ह्मणतात प्रिये, वरदचतुर्थीचें व्रत करणारानें त्या दिवशीं सत्यविनायकाचें तीर्थमात्र घ्यावें आणि पंचमीला पारणेच्या वेळीं प्रसाद सेवन करावा ॥ ४० ॥ सूत ह्मणतात, ऋषिजन हो, याप्रमाणें हें शुभकारक सत्यविनायकाचें व्रत पूर्वी शंकरांनीं पार्वतीला जसें सांगितलें होतें व नारदानें

॥ शिवउवाच ॥ ॥ तिष्ठेत्स्वीकृत्यतीर्थंतत्तद्दिनेनियतोव्रती ॥ पंचम्यां सेवयेत्पश्चात्पारणावसरेप्रिये ॥ ४० ॥ ॥ सूतवाच ॥ ॥ इतिवःकथितंनानाकथांतरसमन्वितम्॥ व्रतंविनायकस्येदंशौनकाद्यामहर्षयः॥४१॥ यथाशिवेनकथितंगिरिजायैशुभावहम् ॥ ब्रह्मणानारदायोक्तमादरात्परिपृच्छते ॥ ४२ ॥ कलेर्मलहरंपूर्णसद्यःप्रत्ययकारकम् ॥ ४३ ॥ ॥ ॥ इति श्रीब्रह्मांडपुराणेशिवपार्वतीसंवादेसत्यविनायकोपाख्यानेपंचमोऽध्यायः ॥ ५ ॥ श्रीसत्यविनायकार्पणमस्तु ॥ शुभंभवतु ॥ ॥

आदरानें विचारल्यावरून ब्रह्मदेवानें नारदाला जसें सांगितलें होतें त्याप्रमाणें मी हें कलिकल्मषहरण करणारें आणि तत्काल अनुभव देणारें चरित्र तुह्मांला सांगितलें ॥ ४१ ॥ ४२ ॥ इति श्रीब्रह्मांडपुराणे सत्यविनायककथामहाराष्ट्रभाषाव्याख्यायां पंचमोऽध्यायः ॥५॥ ॥ श्रीसत्यविनायककथा संपूर्णा ॥ ॥४०॥

॥ श्रीः ॥  ॥ कथाश्रवणोत्तरम् ॥ आचम्यप्राणानायम्य ॥ अद्यपूर्वोच्चरि०
श्रीसत्यविनायककथाश्रवणसांगतासिद्ध्यर्थंपुस्तकपूजनपूर्वकंवाचकपूजनमहं
करिष्ये ॥ इतिसंकल्प्य ॥ श्रीसरस्वत्यैनमइतिनाममंत्रेणगंधाद्युपचारैःपुस्तकपू
जांकृत्वा ॥ श्रीव्यासस्वरूपिणेब्राह्मणायेदमासनमित्यादिपाद्यार्घ्याचमनीयगंध
पुष्पाक्षतवस्त्रालंकारतांबूलफलदक्षिणाभिर्यथाविभवंपौराणिकपूजांकुर्यात् ॥ ॥
ततोभगवतेमहानैवेद्यार्पणं ॥ आचम्यअद्यपूर्वो०श्रीत्यर्थंगंधादिपंचोपचारैःपूजन
महंकरिष्ये ॥ इतिसंकल्प्य ॥ ॐ तस्माद्यज्ञात्सर्वहुतऋचः ॥ श्रीखंडंचं० ॥ ॐस
त्यवि० ॥ चंदनं० ॥ अक्षताः० ॥ ॐसत्यवि० ॥अक्षतान्सम० ॥ ॐतस्मादश्वा०
॥ माल्यादीनि० ॥ ॐ श्रीसत्य० ॥ पुष्पाणिस० ॥ ॐ यत्पुरुषं० ॥ वनस्पतिरसो०
ॐ श्रीसत्य० ॥ धूपंस० ॥ ॐ ब्राह्मणोस्य० ॥ साज्यंच० ॥ ॐ श्रीसत्य० ॥
दीपंस० ॥ ॐ चंद्रमा० ॥ चतुर्विधान्नसंपन्नंमधुरंमोदकान्वितम् ॥ नैवेद्यंतेमया
दत्तंभोजनंकुरुविघ्नप ॥ ॐ श्रीसत्य० ॥ महानैवेद्यंसम० ॥ अमृतो० ॥ प्राणाय०

६ ॥ नैवेद्यमध्येप्राशनार्थेपानीयंस० ॥ पुनःप्राणाय० ६ ॥ उत्तरापोशनंस० ॥ हस्तप्रक्षा० ॥ मुखप्रक्षा० ॥ आचमनीयं० ॥ करोद्वर्तनं० ॥ पूगीफलमितितांबूलं ॥ हिरण्यगर्भेतिदक्षिणां ॥ इदंफलमितिफलम् ॥ ततःआर्तिक्यम् (आर्ती) नमोस्त्वनं० ॥ नमस्कार० यानिकानिचेतिप्रदक्षिणा ॥ मंत्रपुष्पांजलिंसमर्प्य ॥ अनेनपंचोपचारपूजनेन श्रीसत्यविनायकःप्रीयतांनमम ॥ ॐ तत्सद्ब्रह्मार्पणमस्तु ॥ ॥ अद्यपूर्वोच्च० श्रीसत्यविनायकव्रतसांगतासिद्ध्यर्थंयथाशक्ति (यथावकाशेन) ब्राह्मणसुवासिनीसमाराधनमहंकरिष्ये ॥ तथाचभूयसींदक्षिणांदातुमहमुत्सृजे ॥ इतिसंकल्प्यभूयसींदद्यात् ॥ ततःसर्वेभ्यस्तीर्थप्रसादंदत्वास्वयंगृह्णीयात् ॥ तत्रतीर्थग्रहणमंत्रः ॥ अकालमृत्युहरणंसर्वपापविनाशनम् ॥ देवपादोदकंतीर्थंजठरेधारयाम्यहम् ॥ इतितीर्थमंत्रः ॥ प्रसादंहस्तेगृहीत्वा ॥ बहुजन्मार्जितंयन्मेदेहेस्तिदुरितंहितम् ॥ प्रसादभक्षणाद्यातुलयंसत्यविनायक ॥ इतिप्रसादंभुक्त्वा ॥ ब्राह्मणान्सुवासिनीश्चभोजयित्वा बंधुसुहृन्मित्रादिभिःस

हस्वयंभुंजीत ॥ ततोरात्रौश्रीसत्यविनायकसन्निधौ वेदपठनभजननृत्यगायन
नानावाद्यवादनादिभिर्जागरणंकृत्वा प्रातर्नित्यकर्मसाधनानंतरमुत्तरपूजांकु
र्यात् ॥ ॥ सायथा ॥ ॥ आचम्य प्राणानायम्य देशकालौसंकीर्त्य ॥ श्रीस
त्यविनायकप्रीत्यर्थं आवाहितदेवतानामुत्तरपूजनमहंकरिष्ये ॥ इतिसंकल्प्य ॥
आवाहिताखिलदेवताभ्योनमःइतिनाममंत्रेणगंधाद्युपचारैः प्रार्थनांतंसंपूजयेत्
॥ ततोहस्तेअक्षतान्गृहीत्वा॥ ॐउत्तिष्ठब्रह्मणस्पते० ॥ यांतुदेवगणाःसर्वेपूजामा
दायपार्थिवात्॥इष्टकामप्रसिद्ध्यर्थंपुनरागमनायच ॥ इतिदेवतोपरिअक्षतान्नि
क्षिपेत् ॥ ॥ अथपीठदानम् ॥ आचम्य ॥ अद्यपूर्वो० श्रीसत्यविनायकव्रतसां
गतासिद्ध्यर्थं आचार्यायपीठदानंकरिष्ये ॥ तथाआचार्यपूजनमहंकरिष्ये ॥
इतिसंकल्प्य आचार्यमासनपाद्यादिभिःसंपूज्य ॥ विप्रायवेदविदुषेश्रोत्रियायकु
टुंबिने ॥ नरकोत्तारणार्थायअच्युतःप्रीयतामिति ॥ इदंश्रीसत्यविनायकपीठदा
नंसदक्षिणाकंसतांबूलं–शर्मणेब्राह्मणायतुभ्यमहंसंप्रददेप्रतिगृह्यताम् ॥ आचा

यं:प्रतिगृह्णामीतिवदेत् ॥ अनेनपीठदानेनश्रीसत्यविनाकःप्रीयतांनमम ॥
ॐ तत्सद्ब्रह्मार्पणमस्तु ॥ कर्मांतेद्विराचामेत् ॥ ॥ शुभं भवतु ॥ ॥ छ ॥



हें पुस्तक वे. शा. रा. रा. वासुदेव लक्ष्मणशास्त्री पणशीकर यांनीं तयार केलें. तें मुंबईमध्यें
“ निर्णयसागर ” छापखान्याचे मालक **पांडुरंग जावजी** यांनीं छापवून
प्रसिद्ध केलें. शके १८४१ सन १९१९.

( आवृत्ती तिसरी । )





Publisher:—Pandurang Jawaji, } at the Nirnaya-Sagar Press,
Printer:—Ramchandra Yesu Shedge, } 23, Kolbhat Lane, Bombay.

